**"सहायक कक्ष अधिकारी मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा-२०२२" मधील गुणवत्तेनुसार शिफारसप्राप्त उमेदवारांचे मंत्रालयीन विभागात नियतवाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : मविप १४२३/प्र.क्र.३३/१४-अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २३ फेब्रुवारी, २०२३

वाचा:- १) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, जाहिरात क्रमांक: ०८६/२०२२, दि. २९-०९-२०२२.
२) म.लो.आ. क्र. १४४२ /सकअमविप/२०२२/२४, दिनांक ०३-०२-२०२३ चे पत्र

**आदेश**

मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/१०१७ च्या अंतिम न्यायनिर्णयाचे अधिन राहून, **"सहायक कक्ष अधिकारी मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा २०२२"** अंतर्गत मंत्रालयीन विभागातील ६२ पदे ही गुणवत्तेनुसार भरण्याबाबतची जाहिरात महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत दि. २९-०९-२०२२ रोजी प्रसिध्द करण्यात आली होती.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक १०-१२-२०२२ रोजी सदर परीक्षा घेऊन, प्रस्तुत परीक्षेचा अंतिम निकाल आयोगाच्या संकेतस्थळावर दिनांक ०१-०२-२०२३ रोजी प्रसिध्द केला. आयोगाने संदर्भाधिन क्र. २ येथील पत्रान्वये दिव्यांग आरक्षणासह ६२ उमेदवारांची सहायक कक्ष अधिकारी या पदासाठी शिफारस केली आहे. त्यापैकी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या ६० उमेदवारांचे मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप **सोबतच्या परिशिष्ट-अ** नुसार खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) | सदर आदेश मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेली विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ च्या अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सहायक कक्ष अधिकारी पदावर पदस्थापना करण्यात येत आहे. |
| २) | शिफारसपात्र ठरलेल्या उमेदवारांबाबत काही न्यायालयीन प्रकरणे/फौजदारी खटले/ विभागीय चौकशी प्रलंबित असल्यास पदोन्नतीच्या पदावर कार्यमुक्त करण्यापूर्वी/ नियुक्ती देण्यापूर्वी या बाबींची खातरजमा सदर उमेदवार सध्या ज्या विभागात कार्यरत आहेत त्या विभागांनी करावी. |
| ३) | सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप केलेल्या उमेदवारांनी दिनांक २३-०३-२०२३ (म.नं.) पर्यंत पदोन्नतीने पदस्थापना केलेल्या विभागामध्ये हजर व्हावे. ज्या उमेदवारांची नियुक्ती सध्याच्या कार्यरत विभागातून अन्य विभागात करण्यात आली आहे, त्या उमेदवारांना संबंधित विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे. संबंधित उमेदवारांनी आपली सहायक कक्ष अधिकारी पदावरील पदस्थापना तात्काळ स्विकारावी. सदर पदोन्नती उपरोक्त नमूद कालावधीमध्ये स्विकारली नाही तर, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/कार्यासन-१२, दिनांक १२.०९.२०१६ अन्वये कार्यवाही करण्यात येईल. मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, ह्या उमेदवारांचे नेमणूकीचे आदेश लवकरात-लवकर निर्गमित करावेत. तसेच, ज्या |

| | | |
|---|---|---|
| | उमेदवारांचे नियतवाटप विभागाच्या बाहेर करण्यात आले आहे, त्या उमेदवारांनी किंवा त्यांच्या विभागांनी अन्य विभागात पदस्थापना देण्यात आलेल्या उमेदवारांना त्याच विभागात ठेवण्यासाठी स्वतंत्र टिप्पणी/ प्रस्ताव सादर करु नये. | |
| ४) | सदर परीक्षेद्वारे सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्त होणाऱ्या उमेदवारांची सेवाज्येष्ठता ही, जे उमेदवार विहित कालावधीत ३० दिवसाच्या आत रुजू होतील, त्यांच्या बाबतीत सेवाज्येष्ठता नियतवाटपाच्या आदेशाच्या दिनांकापासून आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारसक्रमानुसार व म.ना.से. (सेवाज्येष्ठता) विनियमन २०२१ मधील तरतुदीनुसार निश्चित केली जाईल. | |
| ५) | संबंधित उमेदवारांची सहायक कक्ष अधिकारी पदावरील पदस्थापना ज्या विभागामध्ये करण्यात आली आहे, त्या विभागाने सहायक कक्ष अधिकारी मर्यादित विभागीय परीक्षेकरीता आस्थापना अधिकारी किंवा कार्यालय/ विभागाप्रमुख अधिकारी यांनी द्यावयाचे प्रमाणपत्र व त्याअनुषंगाने संबंधित कागदपत्रे पडताळणी करुन नियुक्तीचे आदेश निर्गमित करावेत व लहान कुटुंबाच्या प्रतिज्ञापनाचा नमुना हे दोन्ही प्रमाणपत्र उपलब्ध करुन नियुक्ती आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्याने करावी. तसेच सर्व उमेदवारांची खालील बाबींची तपासणी करण्याच्या अधीन राहून नियुक्ती आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी करावी :- | |
| | अ) | उमेदवारांनी लिपिक-टंकलेखक पदाची सेवाप्रवेशोत्तर परीक्षा विहित कालावधीत उत्तीर्ण केली आहे. |
| | ब) | ज्या उमेदवारांची लिपिक,लिपिक-टंकलेखक व टंकलेखक पदावर मागास प्रवर्गातून नियुक्ती झाली आहे अथवा सदर परीक्षेसाठी मागास प्रवर्गातून अर्ज सादर केला आहे, अशा मागासवर्गीय उमदेवारांचे जाती/जमातीचे दावे वैध ठरले आहेत. |
| | क) | नियतवाटप करण्यात आलेले ६० उमेदवारांबाबत काही न्यायालयीन प्रकरणे/ फौजदारी खटले/विभागीय चौकशी चालू अथवा प्रलंबित असल्यास नियुक्ती देण्यापूर्वी सदर बाबींची नियमानुसार तपासणी करुन संबंधित उमेदवारास नियुक्ती देण्यासंदर्भात कार्यवाही करणे आवश्यक आहे. असे उमेदवार असल्यास, उमेदवार सध्या ज्या विभागात कार्यरत आहेत, त्या विभागाने त्यांना कार्यमुक्त न करता/ पदस्थापना न देता तात्काळ सामान्य प्रशासन विभागाला कळवावे. |
| | ड) | नियतवाटप करण्यात आलेले उमेदवार, शासन अधिसूचना, सा.प्र.वि., दि. ०१-०६-२०२२ नुसार अटींची पूर्तता करीत असल्याचे संबंधित विभागांनी खात्री करावी, तद्नंतरच संबंधित उमेदवाराची सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती करण्यात यावी. |
| ६. | महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या गुणवत्तेनुसार ६२ उमेदवारांपैकी शिफारस यादीतील **अ.क्र. ८ येथील श्री. शि.सं. गजबार हे भ.ज. (क) व अ.क्र.४६ येथील श्री. दे.का. आव्हाड, हे भ.ज. (ड) प्रवर्गातील उमेदवार असून त्यांनी अद्याप जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नसल्याने** सदर २ उमेदवारांव्यतिरिक्त उर्वरित ६० उमदेवारांचे **सोबतच्या परिशिष्ट-अ** नुसार नियतवाटप करण्यात येत आहे. | |

| | |
|---|---|
| ७. | महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने गुणवत्तेनुसार **“सहायक कक्ष अधिकारी मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा २०२२”** मधून शिफारस केलेल्या उमेदवारांच्या कोणत्याही कागदपत्रांची पडताळणी केलेली नाही, तथापि आयोगाने त्यांच्या दिनांक ०३-०२-२०२३ रोजीच्या शिफारस पत्रान्वये असे निदर्शनास आणून दिले की, "उमेदवारांनी ऑनलाईन पध्दतीने त्यांच्या अर्जात दिलेल्या माहितीच्या आधारे निकाल तयार करण्यात आला आहे. शिफारसपात्र ठरलेल्या उमेदवारांची पदासाठीची पात्रता तसेच त्यांचे गोपनीय अभिलेख, दिव्यांग उमेदवारांबाबत त्यांची दिव्यांगत्वाची प्रमाणपत्रे शासन परिपत्रकात नमूद केलेल्या तरतुदीनुसार नियुक्तीपूर्वी तपासण्याच्या अधीन राहून त्यांची शासनाकडे शिफारस करण्यात येत आहे. शासन स्तरावर पात्रता तपासताना अपात्र ठरणाऱ्या उमेदवारांची शिफारस कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल, अशी सूचना उमेदवारांना पाठविण्यात आलेल्या शिफारस पत्रात नमूद करण्यात आली आहे." त्यानुसार सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नियतवाटप करण्यात आलेल्या उमेदवारांनी आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत व ओळखपत्राची प्रत नियतवाटप केलेल्या विभागांना स्वतंत्रपणे उपलब्ध करून देण्यात येत आहेत. उमेदवारांनी आवेदनपत्रामध्ये नमुद केलेल्या माहितीची (उदा. संपूर्ण नाव, जन्मदिनांक, शैक्षणिक अर्हता, जात प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र, सेवापुस्तकाच्या पहिल्या पानाची प्रत, अधिवास प्रमाणपत्र इ.) नियतवाटप केलेल्या विभागाने पडताळणी करुन तद्नंतर संबंधित उमेदवारांचे सहायक कक्ष अधिकारी पदावरील नियतवाटप आदेश निर्गमित करावेत. |
| ८. | नियतवाटप करण्यात आलेले सर्व उमेदवार संदर्भाधीन क्र. १ येथील जाहिरातीतील सर्व अटींची पूर्तता करीत असल्याची नियुक्तीपूर्वी सखोल तपासणी उमेदवारांचे नियतवाटप केलेल्या संबंधित विभागातील नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी करावी. |

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०२२३१८०१२६८९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.02.23 18:05:23 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधित लिपिक-टंकलेखक (सध्या ज्या विभागात कार्यरत आहेत त्या विभागामार्फत)

**प्रत,**

१) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

२) सह सचिव/उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

३) निवड नस्ती/संग्रहार्थ (साप्रवि/कार्यासन १४-अ).

**शासन आदेश क्रमांक मविप-१४२३/प्र.क्र.३३/१४-अ, दिनांक २३.०२.२०२३ सोबतचे परिशिष्ट "अ"**

| अ. क्र. | श्री/ श्रीमती | कर्मचाऱ्याचे नांव | गुणवत्ता यादी नुसार गुणवत्ता क्रमांक | परीक्षेचे वर्ष | मलोआने ज्या प्रवर्गातून शिफारस केली तो प्रवर्ग | कर्मचाऱ्याचा जाती प्रवर्ग | सध्याचा विभाग | नियतवाटप केलेला विभाग |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** | **९** |
| १ | श्री | शि.चं.माशाळकर | १ | २०२२ | खुला | खुला | पापुवस्ववि | आदिवासी विकास विभाग |
| २ | श्री | भ.सो.पिसुरे | २ | २०२२ | खुला | खुला | जलसंपदा | गृह विभाग |
| ३ | श्री | म.भु.सोखी | ३ | २०२२ | खुला | खुला | नविवि | इतर मागास बहुजन कल्याण विभाग |
| ४ | श्री | द.प्र.कदम | ४ | २०२२ | खुला | खुला | कृषिपदुम | सामान्य प्रशासन विभाग |
| ५ | श्री | स.गो.नरोडे | ५ | २०२२ | खुला | खुला | साबांवि | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| ६ | श्री | ना.ना.गटकाळ | ६ | २०२२ | खुला | खुला | शाशिवक्रीवि | सामान्य प्रशासन विभाग |
| ७ | श्री | भि.त्र्यं.गौरकर | ७ | २०२२ | खुला | खुला | मभावि | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग |
| ८ | श्री | ता.शि.बिरादार | ९ | २०२२ | खुला | खुला | सपववि | जलसंपदा विभाग |
| ९ | श्री | व.अ.शेख | १० | २०२२ | खुला | खुला | मववि | वित्त विभाग |
| १० | श्रीमती | चि.द.काळे | ११ | २०२२ | खुला | अजा | पर्यावरण | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| ११ | श्री | न.म.बाहेती | १२ | २०२२ | खुला | खुला | उऊवकावि | सामान्य प्रशासन विभाग |
| १२ | श्री | ग.वि.इंदुरकर | १३ | २०२२ | खुला | इमाव | मववि | शालेय शिक्षण विभाग |
| १३ | श्री | सं.वि.पवार | १४ | २०२२ | खुला | विजा(अ) | ग्राविवि | गृह विभाग |
| १४ | श्रीमती | सा.दि.पाटील | १५ | २०२२ | खुला | खुला | आविवि | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग |
| १५ | श्री | वि.आ.पाटील | १६ | २०२२ | खुला | खुला | उवतंशिवि | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग |
| १६ | श्रीमती | शा.प.थोरात (शा.न.सोनार) | १७ | २०२२ | खुला | इमाव | साआवि | कृषि व पदुम विभाग |
| १७ | श्री | प्र.अ.जाधवर | १८ | २०२२ | खुला | भज(ड) | जलसंपदा | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| १८ | श्री | म.म.कानडे | १९ | २०२२ | खुला | खुला | गृह विभाग | वित्त विभाग |
| १९ | श्री | वि.मा.वडजे | २० | २०२२ | खुला | खुला | शाशिवक्रीवि | मृद व जलसंधारण विभाग |
| २० | श्री | अ.के.मोरे | २१ | २०२२ | खुला | खुला | साबांवि | जलसंपदा विभाग |
| २१ | श्री | सो.शि.सुद्रीक | २२ | २०२२ | खुला | इमाव | ग्राविवि | सार्वजनिक बांधकाम विभाग |
| २२ | श्री | म.पां.पाटील | २३ | २०२२ | खुला | इमाव | वैशिवऔद्रवि | दिव्यांग कल्याण विभाग |
| २३ | श्रीमती | अं.कृ.ठाकरे | २४ | २०२२ | खुला | इमाव | साबांवि | जलसंपदा विभाग |
| २४ | श्री | जु.चाँ.शेख | २५ | २०२२ | खुला | इमाव | साप्रवि | ग्राम विकास विभाग |
| २५ | श्री | ग.द.गिराम | २६ | २०२२ | खुला | इमाव | नविवि | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग |
| २६ | श्री | वि.मा.भडंगे | २७ | २०२२ | खुला | भज(क) | नियोजन | महसुल व वन विभाग |
| २७ | श्री | रा.भ.वानखेडे | २८ | २०२२ | खुला | अजा | ग्राविवि | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |
| २८ | श्रीमती | पु.बा.भोसले | २९ | २०२२ | खुला | खुला | साबांवि | वित्त विभाग |
| २९ | श्री | सो.म.गोमासे | ३० | २०२२ | खुला | इमाव | नियोजन | गृह विभाग |
| ३० | श्री | वि.म.हिरेकर | ३१ | २०२२ | खुला | अजा | आविवि | सामान्य प्रशासन विभाग |
| ३१ | श्री | नि.आ.अडसरे | ३२ | २०२२ | खुला | खुला | मववि | जलसंपदा विभाग |
| ३२ | श्री | सु.पां.पाटील | ३३ | २०२२ | खुला | खुला | शाशिवक्रीवि | गृहनिर्माण विभाग |

| अ. क्र. | श्री/ श्रीमती | कर्मचाऱ्याचे नांव | गुणवत्ता यादी नुसार गुणवत्ता क्रमांक | परीक्षेचे वर्ष | मलोआने ज्या प्रवर्गातून शिफारस केली तो प्रवर्ग | कर्मचाऱ्याचा जाती प्रवर्ग | सध्याचा विभाग | नियतवाटप केलेला विभाग |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** | **९** |
| ३३ | श्री | रो.सु.नाईक | ३४ | २०२२ | खुला | इमाव | सपववि | महिला व बाल विकास विभाग |
| ३४ | श्री | वि.सु.सपाटे | ३५ | २०२२ | खुला | खुला | अनापुवग्रासंवि | सामान्य प्रशासन विभाग |
| ३५ | श्री | चं.सु.आसोले | ३६ | २०२२ | खुला | इमाव | कृषिपदुम | ग्राम विकास विभाग |
| ३६ | श्री | ग.सो.वाघमोडे | ३७ | २०२२ | खुला | भज(क) | वित्त विभाग | आदिवासी विकास विभाग |
| ३७ | श्री | कि.सु.भिसे | ३८ | २०२२ | खुला | इमाव | विवन्यावि | सामान्य प्रशासन विभाग |
| ३८ | श्री | चे.अं.पाटील | ३९ | २०२२ | खुला | खुला | कौविवउवि | महसुल व वन विभाग |
| ३९ | श्रीमती | प्रां.ह.कोळगीरे | ४० | २०२२ | खुला | खुला | उवतंशिवि | विधि व न्याय विभाग |
| ४० | श्री | बि.अ.साखरकर | ४१ | २०२२ | खुला | इमाव | जलसंपदा | वित्त विभाग |
| ४१ | श्री | शि.वि.कातकडे | ४२ | २०२२ | खुला | भज(ड) | अल्पसंख्याक विकास विभाग | गृह विभाग |
| ४२ | श्री | प्र.ल.माने | ४३ | २०२२ | खुला | खुला | नविवि | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग |
| ४३ | श्री | मा.ना.इबिते | ४४ | २०२२ | खुला | खुला | नियोजन विभाग | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| ४४ | श्री | आ.आ.चव्हाण | ४५ | २०२२ | खुला | खुला | ग्राविवि | जलसंपदा विभाग |
| ४५ | श्री | अ.रो.कदम | ४७ | २०२२ | खुला | खुला | उवतंशिवि | दिव्यांग कल्याण विभाग |
| ४६ | श्री | वि.पां.मोरे | ४८ | २०२२ | खुला | खुला | गृह विभाग | उच्च व तंत्र शिक्षण विभाग |
| ४७ | श्री | सं.स.पाटील | ४९ | २०२२ | खुला | खुला | वैशिवऔद्रवि | नगर विकास विभाग |
| ४८ | श्री | सं.प्र.दौंड | ५० | २०२२ | खुला | भज(ड) | साआवि | जलसंपदा विभाग |
| ४९ | श्री | आ.वै.वानखेडे | ५१ | २०२२ | खुला | इमाव | मववि | पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग |
| ५० | श्री | ग.ना.घाडगे | ५२ | २०२२ | खुला | खुला | गृहनिर्माण | नगर विकास विभाग |
| ५१ | श्रीमती | वि.ग.आसोले | ५३ | २०२२ | खुला | खुला | उऊवकावि | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| ५२ | श्रीमती | स.मो.तिदमे | ५४ | २०२२ | खुला | इमाव | साप्रवि | कौशल्य विकास, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग |
| ५३ | श्री | वि.वि.म्हेत्रे | ५५ | २०२२ | खुला | खुला | कौविवउवि | विधि व न्याय विभाग |
| ५४ | श्रीमती | रं.न.चौगले (रं.मा.भोसले) | ५६ | २०२२ | खुला | खुला | जलसंपदा | ग्रामविकास व पंचायत राज विभाग |
| ५५ | श्री | अ.सा.डुबे | ५७ | २०२२ | खुला | खुला | आविवि | कृषि व पदुम विभाग |
| ५६ | श्री | मा.रा.चौगुले | ५८ | २०२२ | खुला | भज(क) | सपववि | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| ५७ | श्रीमती | शि.ई.चिले | ५९ | २०२२ | खुला | भज(ब) | उऊवकावि | नियोजन विभाग |
| ५८ | श्रीमती | तृ.सु.कडव (तृ.अ.पोवार) | ६० | २०२२ | खुला | खुला | जलसंपदा | नियोजन विभाग |
| ५९ | श्री | अ.अ.भोईटे | ६१ | २०२२ | दिव्यांग (कर्णबधिर) | खुला | मववि | महसुल व वन विभाग |
| ६० | श्री | वि.कृ.गायकवाड | ६२ | २०२२ | दिव्यांग (अल्पदृष्टी) | इमाव | विवन्यावि | जलसंपदा विभाग |